**प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतर्गत सन २०२१-२२ या वर्षांमध्ये सातारा जिल्ह्यातील प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यास परवानगी देण्याबाबत आणि सन २०२२-२३ या वर्षामध्ये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यास परवानगी देऊन निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०२३/०५/प्र.क्र.१९९/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ जून, २०२३.

संदर्भ :- १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन पत्र क्रमांक टिडीएस २०२२/०७/प्र.क्र. ४२३/पर्यटन, दि. २५.०७.२०२२ व दिनांक २८.०७.२०२२.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमाक टिडीएस २०२२/०७/प्र.क्र.४१३/पर्यटन दिनांक ०२.११.२०२२.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक टिडीएस २०२२/०७/प्र.क्र ४१३/पर्यटन, दिनांक १६.११.२०२२
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२२/०७/प्र.क्र.४१३/पर्यटन, दिनांक ०५.१२.२०२२

प्रस्तावना :

प्रादेशिक पर्यटन विकास योजने अंतर्गत दि.०१.०४.२०२१ नंतर मंजुरी दिलेल्या कामांपैकी निविदा न काढलेल्या कामांबाबत तसेच ज्या कामांच्या निविदा मागविण्यात आल्या आहेत. मात्र कार्यादेश दिलेले नाहीत किंवा कार्यादेश देऊनही कामे सुरु झाली नाहीत, अशा कार्याबाबत पुढील आदेशापर्यंत कोणतीही कार्यवाही करण्यात येऊ नये, अशा सूचना संदर्भ क्रमांक १ येथील २५.०७.२०२२ व दिनांक २८.०७.२०२२ च्या पत्रान्वये देण्यात आल्या आहेत.

०२. सन २०२१-२२ व सन २०२२-२३ या वर्षात वेगवेगळ्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांपैकी खालील कामांबाबत (शासन निर्णयानिहाय) पुढील कार्यवाही करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

(अ) सन २०२१-२२ या वर्षात शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२२/०३/प्र.क्र.२०६/पर्यटन दिनांक : २९ मार्च, २०२२ या निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामापैकी खाली नमूद केलेल्या कामाबाबत पुढील कार्यवाही करण्यास परवानगी देण्यात येत आहे:-

शासन निर्णय क्रमांक दि. २०२२/०३/प्र.क्र.२०६/पर्यटन, दिनांक २९ मार्च २०२२

(रुपये लक्षात)

| अ.क्र. व जिल्हा | कामे | अंदाजित रक्कम | यापूर्वी वितरीत रक्कम | कार्यान्वयीन यंत्राणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| सातारा | नगरपरिषद हद्दीतील टेबललॅन्ड येथे वाहनतळ परिसर विकसित करणे | ११३.०० | ३०.०० | मुख्याधिकारी पांचगणी गिरीस्थान नगरपरिषद, पांचगणी |

ब) सन २०२२-२३ या वर्षात शासन निर्णय, दि.२८.०६.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांबाबत पुढील कार्यवाही करण्यास परवानगी देऊन निधी वितरित करण्याबाबत-

प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२२-२३ अंतर्गत शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२२/०६/प्र.क्र.३९२/पर्यटन दिनांक २८ जून २०२२ अन्वये खालील तक्त्यामधील जिल्हास्तरावरील कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि प्रत्यक्षात अर्थसंकल्पीय प्रणालीवर निधी वितरीत करण्यात आला नव्हता. सदर शासन निर्णयात नमूद कामांपैकी खालील कामाबाबत पुढील कार्यवाही करण्यास परवानगी देण्यात येत आहे. तसेच सदर कामांकरीता स्तंभ क्रमांक ४ येथे नमूद केल्यानुसार निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरित करण्यात येत आहे.

(रुपये लक्षात)

| अ.क्र. व जिल्हा | कामे | अंदाजित रक्कम | यापूर्वी वितरीत रक्कम | कार्यान्वयीन यंत्राणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) सातारा | वाई नगरपरिषद हद्दीतील कृष्णा नदी तीरावरील सात घाट हेरिटेज वॉक कृष्णा नदीच्या दोन्ही बाजूस बांधणे | ३००.०० | ९०.०० | वाई नगरपरिषद, वाई |
| २) सातारा | वाई परिषद हद्दीतील नाना नानी पार्क विकसित करणे | १००.०० | ३०.०० | वाई नगरपरिषद, वाई |
| २) सातारा | पांचगणी गिरीस्थान नगरपरिषद पांचगणी दांडेघर नाका येथे रस्ता रुंदीकरण करणे | १००.०० | ३०.०० | पांचगणी गिरिस्थान नगरपरिषद, पांचगणी |
| ३) सातारा | पांचगणी गिरीस्थान नगरपरिषद पांचगणी दांडेघर नाका येथे टोल प्लाझा व इतर अनुषंगिक कामे करणे | २००.०० | ६०.०० | पांचगणी गिरिस्थान नगरपरिषद, पांचगणी |
| | **एकूण** | **७००.००** | **२१०.००** | |

०२. उपरोक्त कामांबाबत इतर अटी व शर्तो संदर्भाधिन शासन निर्णयाप्रमाणेच लागू राहतील.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६१३१५१२१४०४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

UJJWALA SANTOSH DANDEKAR

Digitally signed by UJJWALA SANTOSH DANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=c63ad337cb443baf4ff2dd616156bccf1f2629f47cc9704e8e8523f35b0e6505, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB0449B3A46260C9CACDAD789E301DD18ABAA6D766D244021239745A6F561B29, cn=UJJWALA SANTOSH DANDEKAR
Date: 2023.06.27 12:25:17 +05'30'

**( उज्ज्वला सं. दांडेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, सातारा.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा नियोजन अधिकारी, सातारा
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१०. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.(यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या संबंधित नियंत्रण अधिकारी यांच्याकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
११. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***